९।५ ९४।७

महामंडळ / प्राधिकरण यांचेकडील अतिरिक्त निधी शासनाकडे ठेव म्हणून ठेवण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय क्र. संकीर्ण- १०.०५/प्र.क्र. १३/अर्थोपाय
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दिनांक ०५ एप्रिल, २००५

<u>प्रस्तावना</u> :- राज्याच्या अर्थसंकल्पाकडून विविध महामंडळाना/प्राधिकरणांना मोठ्या प्रमाणात अर्थसहाय्य केले जाते. सदरची महामंडळे/प्राधिकरणे राज्याच्या तिजोरीतून काढलेल्या निधीपैकी अतिरिक्त निधी राष्ट्रीयकृत किंवा अन्य बँकांमध्ये ठेवतात.

राज्य शासन विविध मार्गाने कर्ज घेऊन प्रकल्पासाठी किंवा अन्य प्रयोजनासाठी निधी उपलब्ध करुन देण्यात येते. त्यापैकीच हा निधी असतो. राज्याच्या तिजोरीतून काढलेली रक्कम या संस्था अतिरिक्त निधी बँकामध्ये ठेवून त्यावर व्याज मिळवितात. मात्र राज्याची अर्थोपाय स्थिती त्यामुळे बिघडते. यास्तव या संस्थांनी अतिरिक्त निधी बँकामध्ये ठेवण्याऐवजी राज्य शासनाकडे ठेव म्हणून ठेवण्यात यावा या निष्कर्षास शासन आले आहे आणि म्हणून असा अतिरिक्त निधी शासनाकडे ठेव म्हणून ठेवण्याबाबत महामंडळांना/प्राधिकरणांना निदेश देणे आवश्यक झाले आहे.

<u>शासन निर्णय</u> :-

पाटबंधारे विकास महामंडळे, महाराष्ट्र जीवन प्राधिकारण , महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी व इतर महामंडळे यांना राज्याच्या अर्थसंकल्पातून निधी उपलब्ध करुन देण्यात येतो किंवा राज्याच्या हमीवर बाजारातून उभा केला जातो. हयापैकी अतिरिक्त निधी विविध बँकामध्ये ठेवला जात आहे.हा निधी आता बँकामध्ये न ठेवता तो शासनाकडे ठेव म्हणून ठेवण्यात यावा.

सदर ठेव म्हणून ठेवण्यात येणा-या निधीच्या अटी व शर्ती पुढील प्रमाणे असतील.

(अ) सदर निधी लोकलेखा लेखाशीर्ष " ८३४२,इतर ठेवी - १०३,शासकीय कंपन्या व महामंडळे व इत्यादींच्या ठेवी ".
(००) (०४)..........................
याखाली जमा करण्यात यावा.

(ब) यापैकी आवश्यकतेनुसार लागणारा निधी महामंडळाला / प्राधिकरणाला केव्हाही काढता येईल.

(क) मात्र निधी काढण्यासाठी सात दिवसाची आगाऊ सूचना वित्त विभागाला देण्यात यावी.

(ड) या लेखाशीर्षाखालून काढण्यात येणारी रक्कम लोकलेखा लेखाशीर्ष ८३४२,इतर ठेवी - १०३ (एक) शासकीय कंपन्या व महामंडळे इत्यादींच्या ठेवी ( तीन) (४) .......................याखाली संवितरण रकमा म्हणून दाखविण्यात यावी.

(ई) निधी ठेव म्हणून ठेवण्यासाठी किंवा त्यातून रक्कम काढण्यासाठी विधीमंडळाच्याअनुमतीची गरज लागणार नाही.

हे आदेश त्वरीत अंमलात येतील.

( सु.रा.गायकवाड )
शासनाचे सह सचिव

कृ.मा.प.

प्रति,

प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई
प्रधान सचिव, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ
कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ,नागपूर
कार्यकारी संचालक, गोदावरी पाटबंधारे विकास महामंडळ,औरंगाबाद
कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ,नासिक
कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ,ठाणे.
इतर सर्व महामंडळे
वित्त विभागातील सर्व व्यय कार्यासने
सार्वजनिक उपक्रम,वित्त विभाग
. निवड नस्ती,अर्थोपाय.